महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१०
सन २०१०-११ मधील द्वितीय सहामाहीतील अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरण.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. असक २०१० /प्र.क्र. ७६/जल-११
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ४ ऑक्टोबर, २०१०

संदर्भ : १) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. असक २०१०/प्र.क्र. ४३/जल-११,
दिनांक २४ मे, २०१०.
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज- २०.१०/प्र.क्र. १७३/२०१०/अर्थसंकल्प-३,
दिनांक २१ सप्टेंबर, २०१०.

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१०" (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम,२०१० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजुरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २०१० चा अधिनियम क्र.८ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-८ दि. २७ एप्रिल, २०१० यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. शासनाच्या संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये, प्रथम सहामाहीसाठी एकूण तरतूदीच्या ५० % निधीचे वितरण करण्यात आले आहे. आता, द्वितीय सहामाहीसाठी निधी वितरणासाठी वित्त विभागाने त्यांच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये खालील अटी व शर्ती घातल्या आहेत.

३. नवीन बाबींमध्ये समाविष्ट केलेल्या ज्या पदांच्या निर्मितीसाठी मंत्रिमंडळाच्या मान्यतेची आवश्यकता आहे, ती पदे निर्माण करण्याचे आदेश त्यांनी मंत्रिमंडळाची मान्यता मिळाल्यानंतरच काढावेत.

४. वित्तीय वर्ष सन २०१०-११ च्या दुस-या सहामाहिकरिता आवश्यक असणारा योजनेतर अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीचा उरलेला ५० % निधी व योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या उरलेल्या ५० % पैकी ३० % मर्यादेत परिच्छेद ५.१ मध्ये नमूद केलेल्या योजनांचा अपवाद वगळता अर्थसंकल्पीय अंदाज वितरण प्रणालीवर व संनियंत्रण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे. म्हणजेच योजनेतर प्रकरणी एकूण वार्षिक अर्थसंकल्पित निधीचे संपूर्णपणे वितरण होत असून योजनांतर्गत निधीचे एकूण वार्षिक अर्थसंकल्पित निधीपैकी ८०% वितरण होत आहे.

योजनांतर्गत बाबींसाठी अशा धारिका निधी वितरणासाठी स्वतंत्रपणे नियोजन विभागाकडे पाठविण्याची आवश्यकता नाही.

५.१ खालील बाबींवरील अर्थसंकल्पीय तरतूदी वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय वितरीत/खर्च करता येणार नाहीत-

(अ) तेराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केलेल्या सर्व तरतूदी.

(ब) केंद शासनाकडून प्राप्त होणारा निधी व राज्य शासनाच्या हिश्याचा निधी हा केंद्र शासनाकडून निधी प्रत्यक्ष प्राप्त झाल्याशिवाय वितरीत करता येणार नाहीत, अशा तरतूदी.

(क ) बाह्य सहाय्यित प्रकल्पांसाठी असलेली अनुदाने.

(ड ) भांडवली अर्थसंकल्प विहित पध्दतीने मंजूर झाल्याशिवाय महामंडळाच्या भांडवली अंशदानासाठी केलेल्या तरतूदी.

(इ) शासनांची विविध महामंडळे, विद्युत महामंडळ व त्या अंतर्गत असणाऱ्या कंपन्या यांना देय अर्थसहाय्य, भाग भांडवल व कर्जाच्या तरतूदी.

(फ) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास सवलतीपोटी देय अर्थसहाय्याच्या तरतूदी.

(ग ) महानगरपालिका, नगरपालिकांना देण्यात येणारी अनुदाने

(ह) योजनांच्या कार्यान्वयासाठी सीमांत रकमा (उदा.कापूस एकाधिकार) तसेच तत्सम इतर अर्थसहाय्य (खते)

(य) केंद्र शासनाकडून परस्पर संस्थांना प्राप्त होणा-या हिश्श्यास पुरक राज्य हिश्श्याचा निधी

(ज) स्मारके पुतळे यासाठीचे निधी

(ल) उपयोगिता प्रमाणपत्र किंवा विनियोजन प्रमाणपत्राची आवश्यकता असणा-या अनुदानाच्या रकमा

(म) शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार राबविण्यात येणा-या विशेष स्वरूपाच्या योजना (उदा. कर्जमाफी योजना, नुकसान भरपाईसाठी अर्थसहाय्य)मात्र योजनांतर्गत बाबींसाठी अशा धारिका निधी वितरणासाठी स्वतंत्रपणे नियोजन विभागाकडे पाठवण्याची आवश्यकता नाही.

५.२ तसेच खालील अपरिहार्य व अत्यावश्यक बाबींवरील खर्च वगळता रू.२५ कोटींवरील खर्चाच्या प्रस्तावासाठी वित्त विभागाची सहमती आवश्यक आहे.

वेतन, भत्ते, मजूरी, निवृत्तीवेतन, नैसर्गिक आपत्ती, व्याज, कर्जपरतफेड, आहार खर्च, रुग्णालयातील औषध पुरवठा, शिष्यवृत्या, दूध खरेदी, दूध परिरक्षण, शालेय पोषण आहार, न्यायालयाच्या आदेशान्वये देय रक्कम, दारिद्रय रेषेखालील लोकांना धान्य पुरवठा योजनेवरील खर्च याखालील तरतूदी -

रोजगार हमी योजना, स्थानिक विकास निधी व वैधानिक विकास मंडळांतर्गत निधी याखालील तरतूदी,

सामाजिक न्याय विभागाच्या श्रावण बाळ राज्य सेवानिवृत्ती वेतन योजना, संजय गांधी निराधार अनुदान योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना या योजनांच्या तरतूदी.

६. स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदाने वितरित करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणा-या रकमांचा आढावा घेण्यात यावा , व त्या वसूल करुनच उर्वरित अनुदान वितरित करण्यात यावे.

७. निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

८. सन २०१०-११ चे योजनानिहाय प्रशासकीय मंजूरीचे आदेश स्वतंत्रणे संबंधित कार्यासनामार्फत निर्गमित करण्यात येतील. ते आदेश प्राप्त झाल्यानंतरच योजनांतर्गत/योजेतर योजनांसाठीच्या निधी खर्च करण्याची व संगणक वितरण प्रणालीवर तरतूद वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

९.	माहे ऑक्टोबर २०१० ते मार्च २०११ या द्वितीय सहामाहीचे मासिक निधी विवरणपत्र वित्त विभागास अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर सादर करण्यात आलेले आहे. मान्यतेनंतर नियंत्रक अधिका-यांना ते उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०.	हा शासन निर्णय प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१०१००४२०११३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अस्मिता पाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन) महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, (सामाजिक वनीकरण) महाराष्ट्र राज्य, पुणे
मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद
विभागीय कृषि सहसंचालक, (सर्व)
सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, (सर्व)
अधिक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ,(सर्व)
उपसंचालक, आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
व्हर्च्युअल ट्रेझरी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
वित्त विभाग (अर्थसंकल्प-३, व्यय-१५, अर्थोपाय, अर्थ १७), मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
संचालक (कॉम्प्युटर सेल), लेखा व कोषागारे संचालनालय, नवीन प्रशासन इमारत, ५ वा मजला, मुंबई-३२
उपसचिव (रोखशाखा), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सह सचिव/अवर सचिव/उपसचिव (सर्व) जलसंधारण विभाग, ग्रा.वि. व जसं. विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी (कार्या.क्र.वित्त-१ व वित्त-८), ग्रा.वि. व ज.सं. विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी (जलसंधारण विभाग) (सर्व),ग्रा.वि. व ज.सं. विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्ती (जल-११), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

------